जनहित याचिका क्र.४३/२०१८ मध्ये मा. उच्च न्यायालयाच्या नागपूर खंडपीठाने दि.२९ ऑगस्ट, २०१८ रोजी दिलेल्या आदेशानुसार राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठ, संचालित लक्ष्मीनारायण तंत्रशास्त्र संस्थेतील शिक्षकीय पदे भरण्यास मान्यता देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
उच्च व तंत्र शिक्षण विभाग
शासन निर्णय क्रमांकः न्यायप्र- २०१८/प्र.क्र.१३१/१८/विशि-१
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक:- १६ नोव्हेंबर २०१८

वाचा :-

१. उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्र.एमयुएन-२००४ (१६५/०७)/विशि-५, दि.१५ नोव्हेंबर, २००७
२. वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.३०/२०१६/आ.पु.कक्ष, दि.२५.०५.२०१७.
३. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. पदनि-०६१७/प्र.क्र.२०/आपुक, दि.२९ जून, २०१७.
४. मा. उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर यांचे जनहित याचिका क्र.४३/२०१८ मधील दि.२९.०८.२०१८ चे आदेश.
५. प्रभारी कुलसचिव, राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठ, नागपूर यांचे क्र.आस्था-५/१८/रिक्त पदे/५५४, दि.१४.०९.२०१८ चे पत्र.
६. शासन पत्र क्र.न्यायाप्र-२०१८/प्र.क्र.१३१/१८/विशि-१, दि.०६.१०.२०१८.
७. प्रभारी कुलसचिव, राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठ, नागपूर यांचे क्र.आस्था-५/१८/न्यायप्रकरण/६३३, दि.१५.१०.२०१८ चे पत्र.

प्रस्तावना :-

वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.०२ येथील दि.२५ मे, २०१७ च्या शासन निर्णयान्वये जोपर्यंत आकृतीबंध निश्चित होत नाहीत तोपर्यंत पद भरती, पद निर्मिती तसेच पदे रुपांतरीत करण्यास निर्बंध आहेत. त्यानुसार राज्यातील अकृषि विद्यापीठामधील शिक्षक व शिक्षकेतर पदांचे सुधारित आकृतीबंध निश्चित करण्याची कार्यवाही सुरू आहे. दरम्यान श्री. प्रसन्ना दिनकर सोहळे यांनी मा. उच्च न्यायलय, नागपूर खंडपीठ येथे जनहित याचिका क्र.४३/२०१८ दाखल करून राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठ, नागपूर संचालित लक्ष्मीनारायण तंत्रशास्त्र संस्थेतील रिक्त असलेली शिक्षकीय पदे भरण्यात यावीत अशी मागणी केली. मा. न्यायालयाने सदरहू जनहित याचिका क्र.४३/२०१८ मध्ये दि.२९ ऑगस्ट, २०१८ रोजी सदरहू संस्थेतील रिक्त पदे भरण्याबाबत शासनाने विद्यापीठाशी विचारविनिमय करून योग्य तो निर्णय घेण्याबाबत आदेशीत केले. मा. न्यायालयाने उक्त नमूद जनहित याचिकेत दिलेल्या आदेशानुसार राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठ संचालित

लक्ष्मीनारायण तंत्रशास्त्र संस्थेतील रिक्त असलेली शिक्षकीय पदे भरण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठ संचालित लक्ष्मीनारायण तंत्रशास्त्र संस्थेसाठी शासन मान्य मंजूर पदांपैकी रिक्त असलेली खाली नमूद केल्याप्रमाणे शिक्षकीय पदे भरण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| **अ.क्र.** | **पदनाम** | **मंजूर पदसंख्या** | **कार्यरत पदसंख्या** | **रिक्त पदसंख्या** | **भरतीस मान्यता दिलेली पदसंख्या** |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | प्राध्यापक | १० | ०१ | ०९ | ०७ |
| २ | सहयोगी प्राध्यापक | १४ | ०८ | ०६ | ०३ |
| ३ | सहायक प्राध्यापक | ३८ | २३ | १५ | ०७ |
| **४** | **एकूण** | **६२** | **३२** | **३०** | **१७** |

२. वरील तक्त्यात रकाना क्र.६ मध्ये दर्शविलेली अनुक्रमे प्राध्यापक, सहायोगी प्राध्यापक व सहायक प्राध्यापकांची पदे भरताना सदरहू पदांसाठी विद्यापीठ अनुदान आयोग, अखील भारतीय तंत्रशिक्षण परिषदेने वेळोवेळी विहित केलेली व राज्य शासनाने स्वीकृत केलेली शैक्षणिक अर्हता, पात्रता, अनुभव, राज्य शासनाचे भरतीसंदर्भातील प्रचलित नियम इ. बाबी विचारात घेऊन विहित कार्यपध्दतीचा अबलंब करून भरती प्रकियेची कार्यवाही होईल याची दक्षता घ्यावी.

३. सदरहू पदे भरताना संस्थेतील प्रत्येक अभ्यासक्रम National Board of Accreditation (मानांकनासाठी) अर्ज करण्यास पात्र होईल याची दक्षता घ्यावी.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.५९३/१८/आ.पु.क., दि.१५.११.२०१८ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक क्र.२०१८१११६१५२००८४३०८ आहे. हा आदेश डिजीटील स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vijay Eknath Sable

Digitally signed by Vijay Eknath Sable
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ad74dd20b49c8ab0bc83f54f3d9c91571a6cd47aeb9a9f05783d44cafe7a7d8e, serialNumber=ad8df0c87ab8e6c9f8574ab838dd4c466ebe81828f43e76bfa02129f8e862cd2, cn=Vijay Eknath Sable
Date: 2018.11.16 16:06:33 +05'30'

**( विजय साबळे )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत :-**

१. मा. राज्यपाल तथा कुलपती यांचे सचिव, राजभवन मलबार हिल, मुंबई,

२. मा. कुलगुरू, राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठ, नागपूर,
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई-१, महाराष्ट्र, (५ प्रती),
४. महालेखापाल (लेखा परीक्षा) मुंबई-१, महाराष्ट्र, (५ प्रती),
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) नागपूर-२, महाराष्ट्र, (५ प्रती),
६. महालेखापाल (लेखा परीक्षा) नागपूर-२, महाराष्ट्र, (५ प्रती),
७. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
८. विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण, नागपूर विभाग, नागपूर,
९. कुलसचिव, राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठ, नागपूर,
१०.जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर,
११.मा. मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई,
१२.मा. राज्यमंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
१३.वित्त विभाग,(आपुक) मंत्रालय,मुंबई,
१४. निवड नस्ती (विशि-१)